**राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील दुसरी व तिसरी पाळीतील व उर्वरित शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी पाळी सुरु करण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या कंत्राटी निदेशकांचे नियमित शासन सेवेत समायोजन करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण- ३३१७/प्र.क्र.२१०/व्यशि-३**
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४

वाचा :- १) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१०/प्र.क्र.६४/व्यशि-३, दि.२३.०८.२०१०

२) कौशल्य, रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. व्यशिअ-२०२०/प्र.क्र.१०२/व्यशि-१ दि. ०७.४.२०२२

३) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-३३१७/प्र.क्र.२१०/व्यशि-३ दिनांक १७.०८.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी आणि उर्वरित औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी पाळी ऑगस्ट २०१० सत्रा पासून सुरू करण्यासाठी दुसऱ्या व तिसऱ्या पाळीत १२३९ व्यवसाय तुकड्यांसाठी आवश्यक असलेल्या १२३९ शिल्पनिदेशक, ५७ गटनिदेशक, २०४ गणित व चित्रकला निदेशक अशा कंत्राटी एकूण १५०० शिक्षकीय पदांच्या निर्मितीस (दरमहा रू. १५०००/- या ठोक मासिक वेतनावर) व त्यासाठी लागणाऱ्या एकूण रू. २४८०.९६ लक्ष इतक्या खर्चास विविध अटींस अधिन राहून दि. २३/०८/२०१० च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. कंत्राटी निदेशक संघर्ष समिती यांनी शासनाला दिलेल्या निवेदनाच्या अनुषंगाने राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी साठी कंत्राटी तत्वावर घेण्यात आलेल्या निदेशकांचे शासन सेवेत नियमित करणेबाबत मागणीच्या अनुषंगाने मंत्रिमंडळाच्या दिनांक १६.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्र. ३ अन्वये समिती गठीत करण्यात आली आहे. मा. मंत्री (कौ.रो.उ.व ना. ) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने "संचालनालयांतर्गत कार्यरत २९७ कंत्राटी निदेशक यांना नियमित पदावर घेण्याप्रकरणी सामान्य प्रशासन विभाग, आदिवासी विकास विभाग, नगर विकास विभाग व कृषी, पशुसंवर्धन दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागातील कंत्राटी/रोजंदारी /अस्थायी कर्मचाऱ्यांच्या सेवा मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये धोरणात्मक निर्णय घेवून नियमित करण्यात आल्या आहेत. त्याच धर्तीवर औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील २९७ कंत्राटी निदेशकांबाबत सद्या रिक्त असलेल्या पदावर नियमित सेवेत सामावून घेण्याबाबतचा प्रस्ताव मंत्रीमंडळासमोर ठेवून त्यावर मंत्रीमंडळाने निर्णय घ्यावा" अशी शिफारस केली आहे. शासन निर्णय दिनांक ०७.०४.२०२२ अन्वये "कौशल्य रोजगार उद्योजकता व नाविन्यता विभागाच्या अखत्यारितील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचा सुधारित आकृतीबध मंजूर झालेला आहे. सदर पदांच्या आकृतीबंधानुसार नियमित पदे व

बाहयस्त्रोताव्दारे मनुष्यबळाच्या सेवा घेण्यास मान्यता दिलेली आहे. शासन निर्णय दिनांक १७.०८.२०२३ अन्वये गठीत करण्यात आलेल्या समितीने शिफारस केल्यानुसार राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी आणि उर्वरित औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसऱ्या पाळीत मान्यता दिलेल्या पदांनुसार सद्यस्थितीत कार्यरत २९७ पदांचे समावेशन मंजूर आकृतीबंधानुसार रिक्त पदांवर करण्यास मंत्रिमंडळाच्या दिनांक १३.०३.२०२४ रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे.

**शासन निर्णय :-**

सद्यस्थितीत औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये कार्यरत २९७ कंत्राटी शिल्पनिदेशकांचे कौशल्य, रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभागांच्या आकृतीबंधात मंजूर उपलब्ध पदांवर “परिशिष्ट अ” मधील नमूद पदांचे समावेशन करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर कर्मचाऱ्यांचे समावेशन खालिल अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

१. समावेशन झालेल्या कर्मचाऱ्यांची नियमित सेवा सर्व प्रयोजनार्थ या शासन निर्णयाचे दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी.
२. नियमित सेवेच्या दिनांकापासून त्यांना सेवाज्येष्ठता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहतील.
३. समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवाकालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तीय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

२. सदर २९७ पदांकरीता वेतन व इतर भत्यांकरीता रु.१६.०९ कोटी प्रतिवर्ष इतक्या आवर्ती खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांकरीता वेतन व भत्त्याकरीता प्रतिवर्षी येणारा येणारा खर्च मागणी क्र. झेडए-२, २२३०-कामगार व सेवायोजन, ०३-प्रशिक्षण, (००३) कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०२)-कारागिरांचे तांत्रिक व व्यवसाय प्रशिक्षण, (०२) (०८) प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (२२३०ए२०९) या लेखाशिर्षांतर्गत ०१ वेतन व भत्ते उद्दिष्टामधील तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३१४१९५०१२३००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NAMDEO KONDIBA BHOSALE

Digitally signed by NAMDEO KONDIBA BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7f81c68231fcd3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C6A286229ECC7982A08553F49D547EF64BE25C7F26FC96324ECE7CCCBFEB8C5, cn=NAMDEO KONDIBA BHOSALE
Date: 2024.03.14 20:24:39 +05'30'

**( डॉ. ना.कों. भोसले )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव , कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय,मुंबई/नाशिक/पुणे /औरंगाबाद/ अमरावती/नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
९. प्राचार्य सर्व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, ( व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत
१०. निवड नस्ती. (व्यशि-३).

**(शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण- ३३१७/प्र.क्र.२१०/व्यशि-३ दिनांक १४ .०३.२०२४ चे परिशिष्ट अ)**

कंत्राटी शिल्पनिदेशक निदेशक यांची संख्या, समावेशनासाठी उपलब्ध पदे याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.:-

| अ.क्र | पदनाम व वेतनश्रेणी | कार्यरत निदेशक संख्या व्यवसाय निहाय | समावेशनासाठी रिक्त पदे |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | गटनिदेशक एस-१५ रु.४१८००-१३२३०० | २० | ४३ |
| २ | गणित तथा चित्रकला निदेशक एस- १४ रु.३८६००-१२२८०० | २६ | २१६ |
| ३ | शिल्पनिदेशक एस-१४ रु.३८६००-१२२८०० | | |
| ३.१ | जोडारी | ५२ | ७७ |
| ३.२ | कातारी | १४ | ५१ |
| ३.३ | संधाता | ३२ | ७३ |
| ३.४ | विजतंत्री | ३५ | ४२ |
| ३.५ | तारतंत्री | २४ | ७१ |
| ३.६ | यांत्रिक डिझेल | ८ | २९ |
| ३.७ | यांत्रिक मोटारगाडी | १७ | ५७ |
| ३.८ | यांत्रिक प्रशितन व वातानुकुलीकरण | १२ | ३६ |
| ३.९ | यांत्रिक कर्षित्र | २ | ३ |
| ३.१० | यंत्र कारागीर | १६ | ४१ |
| ३.११ | यंत्र कारागीर (घर्षक) | ८ | ६ |
| ३.१२ | मेकॅनिक मशिन टूल मेन्टेनन्स | १ | ४ |
| ३.१३ | यांत्रिक इलेक्ट्रॉनिक्स | १० | ३६ |
| ३.१४ | सर्वेक्षक | १ | ४ |
| ३.१५ | कोपा | ८ | १९ |
| ३.१६ | टूल ॲण्ड डाय मेकर (जिग्ज ॲण्ड फिक्चर) | २ | ५ |
| ३.१७ | बेसिक फुड प्रॉडक्शन ( फुड ॲण्ड व्हिजिटेबल प्रोसेसिंग) | १ | १ |
| ३.१८ | बेसिक अकोमोडेशन ऑपरेशन /हॉऊस किपिंग ( फुड प्रोडक्शन जनरल) | १ | ३ |
| ३.१९ | बेसिक मेझरिंग इन्स्टुमेंट ( आयसीटीएसएम/ इलेक्टॉनिक्स मेकॅनिक) | १ | १ |
| ३.२० | बेसिक रेफ्रिजरेशन (यांत्रिक प्रशितन व वातानुकुलीकरण) | १ | ४ |

| | | | |
|---|---|---|---|
| ३.२१ | बेसिक इलेक्ट्रॉनिक्स (यांत्रिक इलेक्ट्रॉनिक्स) | १ | १ |
| ३.२२ | बेसिक ॲनालॉग इलेक्ट्रॉनिक्स (यांत्रिक इलेक्ट्रॉनिक्स) | १ | १ |
| ३.२३ | बेसिक डिजिटल इलेक्ट्रॉनिक्स (यांत्रिक इलेक्ट्रॉनिक्स) | २ | २ |
| ३.२४ | बेसिक पॉवर जनरेशन ॲण्ड ट्रान्समिशन ॲण्ड डिस्ट्रीब्युशन (विजतंत्री) | १ | १ |
| | **एकूण** | **२९७** | **८२७** |